**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम व दुरुस्ती या योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत.**
**(लेखाशिर्ष ३०५५ ००४३)**

# महाराष्ट्र शासन

आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.१५/ कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २७ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी-२०२३/प्र.क्र.१५/का.६, दि. ३१.०१.२०२३

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.०८.१२.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि. ०४.०३.२०२४

३) गृह विभाग, ई ऑफीस नस्ती क्र. H.D-47010/24/2023-Transport1-MHD/परिवहन-१

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत गृह विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या **आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम व दुरुस्ती** या योजनेंतर्गत नंदुरबार जिल्ह्यातील **'धडगाव'** येथील बसस्थानकाचे आधुनिकीकरण व नाशिक जिल्ह्यांतील **'पेठ'** येथील बसस्थानकाची पुनर्बांधणी यासाठी संदर्भ क्र. ०१ येथील शासन निर्णयान्वये निधी वितरीत करण्यात आला होता. आता, उर्वरीत कामांसाठी गृह विभागाने संदर्भ क्र. २ येथील ई ऑफीस नस्तीद्वारा आदिवासी विभागामार्फत सादर केलेल्या प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्रमांक टी-०५ मधील ३०५५, मार्ग परिवहन या मुख्य लेखाशीर्षाखालील **आदिवासी क्षेत्रात एस.टी. डेपोचे विकास, बांधकाम व दुरुस्ती** या योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सुधारित अंदाजात रु. २५४.०१ लाख इतकी तरतूद मंजूर आहे. सदर सुधारित अंदाजाच्या मर्यादेत वित्त विभागाने वितरणासाठी उपलब्ध केल्याप्रमाणे सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

**(रु.लाखात)**

| **अ. क्र.** | **कामाचे नाव** | **लेखाशिर्ष व बाब क्रमांक** | **सुधारित अंदाज** | **सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|
| १ | धडगाव (जि. नंदुरबार) बसस्थानकाचे आधुनिकीकरण | **३०५५ ००४३ बाब-३१**, सहायक अनुदाने (वेतनेतर) | २५४.०१ | ५८.१० |
| २ | पेठ (जि. नाशिक) बसस्थानकाची पुनर्बांधणी | | | ११९.७० |
| | | | **एकुण :-** | **१७७.८०** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु. १७७.८० लाख (अक्षरी रुपये एक कोटी सत्त्यात्तर लाख ऐंशी हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, गृह विभाग यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ मधील नमूद शासन परिपत्रकांमध्ये दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उप लेखाशिर्षनिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय, संदर्भाधीन क्र. ०१ येथील शासन परिपत्रकान्वये व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना वेळो-वेळी प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाने ई ऑफीस नस्ती क्र. H.D-47010/24/2023-Transport1-MHD/परिवहन-१ वर दि. २६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२११०२५१४३५२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a9129 6205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8 , postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF 728255A5EB0A0DD495EF82F98993108863 7D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2024.03.27 19:38:05 +05'30'

**(किरण कि. पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
६) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/ व्यय-१४), मंत्रालय, मुंबई-३२.
११) कक्ष अधिकारी (का-८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग.